नागरिकांची सनद तयार करुन
प्रसिध्द करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक: नासद- २०११/प्र.क्र.१७२/१८-अ
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक: ६ सप्टेंबर, २०११

वाचा :- १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.नासद-२००६/प्र.क्र.१०३/०६/ १८-अ, दिनांक ३ नोव्हेंबर २००६
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.नासद-२००७/११५/प्र.क्र.१८/०७/ १८-अ, दिनांक १३ ऑगस्ट २००७
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.नासद-२००९/४३२/प्र.क्र.८०/०९/ १८-अ, दिनांक २३ जुलै २००९
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.नासद-१००६/प्र.क्र.१०३/०६/ १८-अ, दिनांक ३ ऑगस्ट २००९
५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.नासद-२००९/प्र.क्र.८०/०९/ १८-अ, दिनांक ४ ऑगस्ट २००९
६) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.नासद-१००९/५९५/प्र.क्र.१०२/०९/ १८-अ, दिनांक १२ जानेवारी २०१०

परिपत्रक

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ हा दि.१ जुलै,२००६ पासून राज्यात लागू करण्यात आला आहे. सदरहू अधिनियमातील कलम ८ (१) व (२) नुसार प्रत्येक कार्यालयाने किंवा विभागाने नागरिकांची सनद तयार करुन ती प्रसिध्द करण्याची कार्यवाही करावयाची आहे. त्याचप्रमाणे तशी कार्यवाही केली नाही तर संबंधित अधिनियम, विनियम यामध्ये उल्लेखिलेली कारवाई संबंधितावर जबाबदारी निश्चित करुन करावयाची आहे.

२. नागरिकांच्या सनदेला व्यापक प्रसिध्दी देण्यासाठी खालीलप्रमाणे उपाययोजना करण्याचा निर्णय शासन परिपत्रक दि.१३ ऑगस्ट २००७ अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहे.

(अ) रेडीओ, दूरदर्शन, वर्तमानपत्र इत्यादी माध्यमातून सनदेला प्रसिध्दी देण्यात यावी.

(ब) नागरिकांची सनद उपलब्ध होण्याचे ठिकाण, सनदेची ठळक वैशिष्टे इत्यादीबद्दलची माहिती पत्र/पत्रिका किंवा माहिती पुस्तिकाच्या स्वरुपात त्या क्षेत्रातील सर्व विभागातील/ कार्यालयातील नागरिकांना उपलब्ध करुन देण्यात यावी.

(क) सनदेला व्यापक प्रसिध्दी देण्यासाठी परिस्थितीनुरुप अशासकीय संघटनांचेही (NGO) सहकार्य घेण्यात यावे.

(ड) सनद ही नाममात्र किंमतीला नागरिकांना उपलब्ध करुन देण्यात यावी.

त्याचप्रमाणे दिनांक ३ ऑगस्ट २००९ च्या परिपत्रकान्वये नागरिकांची सनद "लोकराज्य" मासिकामध्ये प्रसिध्द करण्याबाबतच्या सूचनाही निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

३. शासकीय कार्यालयाकरिता नागरिकांच्या सनदेचा नमुना संदर्भाधीन शासन परिपत्रक दि.४ ऑगस्ट २००९ अन्वये पुढीलप्रमाणे विहित करण्यात आलेला आहे.

| अ.क्र. | सेवांचा तपशील | सेवा पुरविणारे अधिकारी/कर्मचारी यांचे नांव व हुद्दा | सेवा पुरविण्याची विहित मुदत | सेवा मुदतीत न पुरविल्यास तक्रार करावयाच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचे नाव व हुद्दा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | | | |

४. संदर्भाधीन शासन परिपत्रकानुसार वेळोवेळी नागरिकांची सनद प्रसिध्द करुन कार्यालयाच्या दर्शनी भागात लावणे इ.बाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत. बहुतेक सर्व विभागांनी नागरिकांची सनद तयार केलेली आहे. काही विभाग तसेच त्यांच्या अधिनस्त कार्यालयाच्या नागरिकांची सनद शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

५. वरीलप्रमाणे महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील तरतुदीनुसार सर्व शासकीय विभाग/कार्यालयांना नागरिकांच्या सनदेबाबत कार्यवाही करणे बंधनकारक असल्याने शासनाकडून वेळोवेळी आवश्यक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तथापि काही शासकीय कार्यालयांनाकडून अद्यापही नागरिकांच्या सनदेबाबतची कार्यवाही केली जात नसल्याचे निदर्शनास आले आहे.

६. उक्त परिस्थितीत वरील प्रमाणे शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार प्रत्येक प्रशासकीय विभागाने त्यांचे खुद्द व त्यांच्या अधिनस्त सर्व कार्यालयांना नागरिकांची सनद तयार करुन ती प्रसिध्द करण्याबाबतची कार्यवाही करावी व नागरिकांची सनद शासनाच्या (विभाग/कार्यालय) संकेतस्थळावर प्रसारित करण्याची कार्यवाही करावी असे पुनश्च निर्देश देण्यात येत आहेत.

७. नागरिकांची सनद प्रसिध्द करण्यास हेतुपुरस्सर विलंब होत असल्याचे निदर्शनास आल्यास संबंधिताविरुध्द उपरोक्त तरतुदीनुसार यथोचित शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात येईल याची सर्व विभागांनी नोंद घ्यावी.

८. संदर्भाधिन दि. ०३ नोव्हेंबर २००६ व १२ जानेवरी २०१० च्या शासन परिपत्रकान्वये नागरिकांची सनद अंतिम करण्यासाठी समिती गठीत करण्यात आली असून या समितीमध्ये प्रधान सचिव (सेवा), अध्यक्ष व सचिव (प्र.सु.र.व का.) आणि महासंचालक, यशदा हे सदस्य आहेत. सदर समितीच्या मान्यतेने नागरिकांची सनद प्रसिध्द करणे आवश्यक आहे. सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिनस्त कार्यालयांची नागरिकांची सनद एकत्रितपणे सादर केल्यास ही कार्यवाही करणे सुलभ होईल.

९. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी या परिपत्रकातील सूचना त्यांच्या अधिनस्त सर्व शासकीय कार्यालयांच्या निदर्शनास आणावी व एक कालबध्द कार्यक्रम आखून नागरिकांच्या सनदेबाबतच्या कार्यवाहीचे पालन केले जाईल याची दक्षता घ्यावी.

१०. सदरील शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९०९११३३१२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

र. गायकवाड

( रत्नाकर गायकवाड)
मुख्य सचिव

प्रति,

१) मा. राज्यपालाचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
५) मुख्य सचिव,
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव / सचिव,
*७) प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
*८) प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ शाखा, मुंबई,
*९) महाप्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय,
*१०) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
*११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*१२) सचिव, विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (५प्रती),

१३) प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई,
१४) प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई,
१५) सर्व मंत्रालयीन विभाग,
१६) महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालयनालय,मुंबई,
१७) सर्व विभागीय आयुक्त,
१८) सर्व जिल्हाधिकारी,
१९) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२०) मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
२१) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२२) निवड नस्ती (कार्यासन १८-अ).

*पत्राने.